**जिल्हा रूग्णालय, बीड येथील डायलेसीस कक्षाच्या वरील तिसऱ्या मजल्याचे बांधकाम व एस.एन.सी.यू.कक्षाच्या वाढीव कामाच्या बांधकामांच्या अंदाजपत्रकांना प्रशासकीय मान्यता.**

**महाराष्ट्र शासन**
**सार्वजनिक आरोग्य विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः प्रशामा २०१४/ प्र.क्र.२११/ आरोग्य-४**
मंत्रालय, १० वा मजला, कॉम्पलेक्स बिल्डींग,
गोकूळदास तेजपाल रूग्णालय आवार, मुंबई.
तारीख: ११ मार्च, २०१५.

वाचा

**१) सहसंचालक, आरोग्य सेवा, रूग्णालये ( राज्यस्तर ) यांचे पत्र क्र.संआसे/राज्यस्तर/बीड/वाढीव बांधकाम/टे-६/कक्ष-३/१४, दि.२५.०९.२०१४.**

**शासन निर्णय**

जिल्हा रूग्णालय, बीड येथील तिसऱ्या मजल्यावर लहान मुलांच्या अतिदक्षता (एस.एन.सी.यू.) कक्षाच्या वाढीव बांधकामाच्या ( डायलेसीस कक्ष बांधकाम, पुरूष व स्त्री सर्जिकल कक्षाच्या दुसऱ्या मजल्यावरील जुन्या भिंतीचे बांधकाम पाडून , जुने स्वयंपाकगृह व जुने प्रसुती कक्षाचे जुने बांधकाम पाडून नविन बांधकाम करणे ) एकूण रू.४२०.३२ लक्ष किंमतीच्या अंदाजपत्रक व आराखड्यांना प्रशासकीय मान्यता देण्याची विनंती शासनास केली आहे. सदर अंदाजपत्रक उपअभियंता, सार्वजनिक बांधकाम उपविभाग, बीड, कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग, बीड व अधिक्षक अभियंता, सार्वजनिक बांधकाम मंडळ, बीड यांनी प्रमाणित केले आहे. तसेच जिल्हा शल्य चिकित्सक, जिल्हा रूग्णालय, बीड यांनी साक्षांकित केले आहे. या रूग्णालयात लहान मुलांचा अतिदक्षता कक्ष सुरू करण्याकरीता वॉर्ड उपलब्ध नाही. या अनुषंगाने डायलेसीस कक्षाच्या वरती तिसऱ्या मजल्याचे बांधकाम करून लहान मुलांच्या अतिदक्षता कक्षाचे बांधकाम करणे आवश्यक आहे.सदर अंदाजपत्रक सन २०१३-१४ च्या दरसूचीवर आधारीत आहे. या अंदाजपत्रकांमध्ये पुढीलप्रमाणे कामांचा समावेश आहे.

| **Sr. No.** | **Description of Work** | **Amount ( ₹ )** |
|---|---|---|
| 1. | Cost of Work | 2,80,36,690.00 |
| 2. | Add for 4 % Contingencies | 11,21,468.00 |
| 3. | Add L/S for External Water Supply | 15,00,000.00 |

| | | |
|---|---|---|
| 4. | Add 11% for Electrification | 33,72,397.00 |
| 5. | Medical Gas Pipe Line ( Addl. Provision ) | 30,00,000.00 |
| 6. | Electrical Lift | 30,00,000.00 |
| | **Total** | **4,00,30,555.00** |
| 7. | Add 5% Centage Charges | 20,01,528.00 |
| | **Total** | **4,20,32,083.00** |

उपरोक्त जिल्हा रूग्णालय, बीड येथील तिसऱ्या मजल्यावर लहान मुलांच्या अतिदक्षता (एस.एन.सी.यू.) कक्षाच्या वाढीव बांधकामाच्या ( डायलेसीस कक्ष बांधकाम, पुरूष व स्त्री सर्जिकल कक्षाच्या दुसऱ्या मजल्यावरील जुन्या भिंतीचे बांधकाम पाडून , जुने स्वयंपाकगृह व जुने प्रसुती कक्षाचे जुने बांधकाम पाडून नविन बांधकाम करणे ) एकूण रू.४२०.३२ (अक्षरी रूपये चार कोटी वीस लक्ष तीस हजार ) इतक्या किंमतीच्या अंदाजपत्रक व आराखड्यांमध्ये ११ टक्के विद्युतीकरण,४ टक्के आकस्मिक खर्च व ४ टक्के सेंटेज चार्जेस याप्रमाणे तरतूदी योग्य करण्यात येऊन रूपये ४१६.३२ लक्ष ( अक्षरी रूपये चार कोटी सोळा लक्ष बत्तीस हजार ) इतक्या रक्कमेस पुढीलप्रमाणे अटींच्या अधिन राहून या शासन निर्णयान्वये प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.

<u>अटी</u>

१. काम सुरू करण्यापुर्वी सदर अंदाजपत्रक सार्वजनिक बांधकाम विभागाचे संबंधित मुख्य अभियंता यांच्याकडून साक्षांकित करून घ्यावे.
२. काम सुरू करण्यापुर्वी मांडणी नकाशा तसेच विस्तृत नकाशास वास्तुविशारदांकडून मंजुरी घेऊनच काम सुरू करावे.
३. ढोबळ स्वरूपात धरण्यात आलेल्या तरतूदीबाबत काम करतेवेळी विस्तृत अंदाजपत्रक दरपत्रके मंजुर करूनच काम हाती घ्यावे.
४. प्रत्यक्ष काम करतेवेळी पर्यावरण विभाग, शासन निर्णय,क्र.इएनव्ही-२०१३/ प्र.क्र.१७७/ तां.क.१,दि.१०.०१.२०१४ मध्ये उल्लेख करण्यात आलेल्या मार्गदर्शक तत्वांनुसार कार्यवाही करण्यात यावी.
५. तिसऱ्या मजल्याचे बांधकाम करण्यापुर्वी इमारतीच्या मुळ संकल्पनांमध्ये या बाबींचा विचार करण्यात आल्याची खातरजमा करावी. अतिरिक्त मजल्याचे बांधकाम केल्यामुळे इमारतीच्या संरचनात्मक बाबींस धोका पोहोचणार नाही, याची कटाक्षाने दक्षता घेण्यात यावी.
६. या कामासाठी निविदा मागविण्याआधी सदर कामाकरीता सार्वजनिक बांधकाम विभागातील सक्षम अधिकाऱ्यांची तांत्रिक मंजुरी घेणे आवश्यक राहील.
७. अर्थसंकल्पात निधीची तरतूद करण्याचा प्रस्ताव संचालक, आरोग्य सेवा, मुंबई यांनी शासनास सादर करावा. तसेच अर्थसंकल्पात निधीची तरतूद केल्याशिवाय सदर कामास सुरूवात करण्यात येऊ नये.

सदर बांधकामांवरील खर्च खालील लेखाशीर्षाखाली भागविण्यात यावा

**मागणी क्र. एच-८**

४२१०- वैद्यकीय सेवा व सार्वजनिक आरोग्य
०१- नागरी आरोग्य सेवा ( वैद्यकीय सहाय्य )
११०- रूग्णालये व दवाखाने
(१) (अ )- पंचवार्षीक योजनांतगर्त योजना-इमारती
(००) (०१)- मोठी बांधकामे ( ४२१० ००१४ )
५३- मोठी बांधकामे

सदर शासन निर्णय सार्वजनिक बांधकाम विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र.३६५/इमा-३, दि.३०.१०.२०१४ अन्वये दिलेल्या सहमतीनुसार व वित्त विभागाच्या शा.नि. क्र.विअप्र-१०.०८/ प्र.क्र.७०/ २००८/ विनियम, दि.१५.०५.२००९ सोबतच्या परिशिष्ट भाग-पहिला, उपविभाग-पाच मधील अनुक्रमांक १ येथील परिच्छेद क्र.१३४ अनुसार प्रशासकीय विभागांना प्रदान करण्यात आलेल्या अधिकारात निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०३०९१५०००२५८१७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Sanjay D Kamalakar

Digitally signed by Sanjay D Kamalakar
DN: CN = Sanjay D Kamalakar, C = IN, S = Maharashtra, O = Government Of Maharashtra, OU = Under Secretary
Date: 2015.03.11 16:21:29 +05'30'

**संजय कमलाकर**
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

प्रत,

१. संचालक, आरोग्य सेवा, मुंबई.
२. सहसंचालक, आरोग्य सेवा, रूग्णालये (राज्यस्तर), मुंबई.
३. सहाय्यक संचालक ( लेखा व लेखापरिक्षा ), आरोग्य सेवा, पुणे.
४. सहसंचालक, आरोग्य सेवा ( अर्थ व प्रशासन ), पुणे.
५. उपसंचालक, आरोग्य सेवा, लातूर मंडळ, लातूर.
६. जिल्हा शल्य चिकित्सक, जिल्हा रूग्णालय, बीड.
७. कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग, बीड.
८. जिल्हा कोषागार अधिकारी, बीड.

९. सार्वजनिक बांधकाम विभाग (इमा-३), मंत्रालय, मुंबई
१०.वित्त विभाग (विनियम कार्यासन ), मंत्रालय, मुंबई.
११.कक्ष अधिकारी (अर्थसंकल्प), सा.आ.वि., मंत्रालय, मुंबई
१२.निवडनस्ती( आरोग्य-४ ), सा.आ.वि.